


राज्य मराठी विकास संस्था
(महाराष्ट्रशासन पुरस्कृत)
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय,
३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१
रजि नं. एफ १६०९४ (मुंबई)
दूरध्वनी : २२६५३९६६ / फॅक्स : २२६३१३२५
Email rmvs_mumbai@yahoo.com

## निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क्र./ २०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.

ह्या प्रकल्पांतर्गत उपलब्ध होणारे ग्रंथ व नियतकालिके प्रतिमुद्राधिकार अधिनियमाची मुदत उलटलेले असल्याने सार्वजनिक स्वरूपात उपलब्ध आहेत. ही सामग्री विविध ग्रंथालयांनी जतन करून ठेवल्यामुळेच आज आपल्याला उपलब्ध होत आहे.

सदर पुस्तके अथवा नियतकालिके जशी उपलब्ध होत जातील तसे त्यांचे संगणकीकरण करून जनतेला ती उपलब्ध करून देण्यात येतील. ह्या ग्रंथांच्या / नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

०१ सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

०२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

०३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

०४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

॥ श्री ॥

# काव्येतिहास-संग्रह

भुजतरुवनच्छायां येषां निषेव्य महौजसां
जलधिरसना मेदिन्यासीदसावकुतोभया ।
स्मृतिमपि न ते यान्ति क्ष्मापा विना यदनुग्रहम्
प्रकृतिमहते कुर्मस्तस्मै नमः कविकर्मणे ॥

राजतरंगिणी.

पुस्तक ८. फेब्रुवारी, सन १८८५. अंक २.

हें मासिक पुस्तक

पुणें येथें

ज्ञानप्रकाश छापखान्यांत

छापिलें.

किंमत ८ आणे.

---

## विषयक्रम.

एके दिवशीं शिंदे व होळकर यांसि बलावून विचारलें कीं, "तुमचे बरोबर पेंढार किती आहे ?" तेव्हां ते बोलले कीं, पंचवीस हजार आहेत. त्याचे सरदारांस बलावून सांगितलें कीं, आमची पेशव्यांची पूर्वापार चाल अशी आहे कीं, अगोदर त्यांचे मुलखांत व त्याचे आमचे भंवताला दोनशें कोसांत आपला मुलूख खेरीज करून दिवा मिळूं नये. याप्रमाणें हुकूम झाला. पेंढार याचे सरदारांस सोन्याचीं कडीं व पोषाख दिले, आणि त्यांस सांगितलें कीं, तुम्हांस लूट माफ आहे. मग पेंढार यांणीं मोठीं मोठीं शहरें अवरंगाबाज व पैठण व जालनापूर व दुसरीं कितीक शहरें व मुलूख जाळून लुटून फस्त केला. दोनशें कोसांत दिवा नाहीं. मग त्यांजकडे कोठून रसद[25] येईल! आधींच पेंढार आणि त्यांत हुकूम झाला, मग काय विचारावयाचें आहे !

एके दिवशीं बाबा फडके तलाव्यास[26] बाहेर पांच चार कोसावर गेले होते. तेथें निजाम अल्ली मोंगल यांची कही[27] घांटाखालीं होती त्या कहीच्या बरोबर स्वार रखवालीस पांच हजार होते. व बाबांबरोबर पांच चारशें स्वार होते. त्यांची व यांची वाटेनें गांठ पडली. त्या वेळेस बाबा फडके पळाले. तेव्हां फडके यांची दहा पांच घोडीं कहीवाल्यांनीं धरून नेलीं. त्यांजबराबर स्वार भारी होते. त्यांणीं मागें जाऊन मश्रूल मुलूख यांजपाशीं खुशालीचें वर्तमान सांगितलें, "हरिपंत तात्याका बेटा तो भाग गया. याजप्रमाणें पेशवे यांची फौज आहे." त्याजवरून मश्रूल मुलूख यांणीं खुशालीचें वर्तमान ऐकून तोफखाना सोडला व साखरा वाटल्या. [illegible] गोविंदराव काळे यांस बलावून भांडांचा तमाशा केला. स[illegible] बहुत आणिलीं. कशीं म्हणाल तरि नाना फडणीस व दौलतराव शिंदे व परशराम भाऊ अशीं नांवें घेऊन सोंगें आणिलीं. आमचे वकिलास दाखविलीं. आणि बोलले याप्रमाणें पुढें व्हावयाचें. असें आमचे वकिलास सांगितलें. चार प्रहर तमाशा जहाला. गोविंदराव काळे वकील आपले डेऱ्यांत जाऊन पत्रें श्रीमंतांकडेस लिहिलीं. तमाशाचें वर्तमान लिहिलें. तीं पत्रें श्रीमंतांकडेस आलीं. गोविंदराव काळे यांचे दिवाण गोविंदराव पिंगळे इकडे नानाकडेस होते, त्यांणीं पत्रें श्रीमंत व नानांस वाचून दाखविलीं.

मग नानांनीं थोरला डेरा दळबादल म्हणोन होता तो उभा करविला. त्या डेऱ्यांत पांच हजार मनुष्यें बसत असा होता. तिसरे प्रहरीं सगळे मानकरी शिंदे, होळकर, भोंसले, पटवर्धन यांस बोलावून कचेरी जहाली. तेथें वकि-

---

२५. रसद=दाणा वैरणीचा पुरवठा.

२६. तलावा=पर्यटण, टेहळणी, लढाई-च्या कामा साठी भोंवतालच्या प्रदेशाची पाहणी करणें.

२७. कही=दाणा वैरण आणणारी टोळी.

त्याचीं पत्रें आलीं होतीं, तीं राजश्री त्रिंबकराव परचुरे यांस सांगितलें कीं, पत्रें सगळे मानकरी यांस मोठ्यानें वाचून दाखवावीं. त्याप्रमाणें त्यांणीं वाचिलीं. सर्वांनीं वर्तमान ऐकलें. मग श्रीमंतांनीं दौलतराव शिंदे व भोंसले यांची मस्करी केली, "पत्रें ऐकतां, पुढें विचार काय करावा ? निजाम अल्ली व मश्रूल मुलूख याणीं अशीं सोंगें आणूं नयेत तीं आणिलीं." मग शिंदे यांणीं विनंती केली कीं, "आम्ही आजपर्यंत स्वारी केली नाहीं. पाटीलबावा यांचा लौकिक. आमची पहिली स्वारी, परंतु महाराजांचे प्रतापें करून काय मौज होईल ती पहावी." याप्रमाणें विनोद केला. बहुत हास्य केलें. राजश्री परशरामभाऊ पटवर्धन बाजूस बसले होते, त्यांस बलावून सांगितलें कीं, "स्वारीचें ओझें तुमचे डोकीवर आहे. या मध्यें पोक्त मोठे तुम्हीच आहां, तुम्ही डोई दिल्याशिवाय पल्ला येणार नाहीं." मग भाऊंनीं विनंती केली कीं, "शिंदे, होळकर, भोंसले असे मोठमोठे आहेत, व आम्हीही पाठीमागें आहोंच." मग नाना बोलले कीं, "दोन टोळ्या केल्या पाहिजेत, आमचे तर्फे भाऊ तुम्ही व बाबा फडके असे नेमावयाचे." मग शिंदे यांस विचारलें कीं, "तुम्ही आपले सरदार कोण नेमितां ?" त्यांणीं सांगितलें कीं, "आमचे तर्फेनें जिवबादादा व लखोबा नाना." मग भोंसले यांस विचारलें, "तुम्ही आपले सरदार कोण नेमितां ?" तेव्हां त्यांणीं सांगितलें कीं, "आमचे तर्फेनें विठ्ठलपंत सुभेदार." होळकर यांणींही आपले तर्फेनें एक दोन सरदार नेमिले. नाना ह्मणाले तुम्ही खाशांनीं श्रीमंताजवळ असा... [illegible] ...नशीं लढाई करावी. मग खाशांवर पाळी येईल. आणि पोतनीस यांस बोलावून सांगितलें कीं, "पोषाख आणावे." परशराम भाऊंस शेला, पागोटें, शिरपेंच, कंठी, व तुरा दिला. जिवबादादा व लखोबा नाना व विठ्ठलपंत सुभेदार व होळकरांकडील सरदार यांस याप्रमाणें पोषाख दिले. हे मोठमोठे मोहरे होते. वरकड मानकरी यांस विडे दिले. आणखी सांगितलें कीं, आपले गोटांतून सड्या फौजा निवडून बाबा फडके पुढें पांच चार कोसांवर जाऊन पूर्वींच उतरले होते; कारण छापा येईल; असें समजोन चवदा हजार हुजुरात मानकरी होते तेथें जाऊन उतरावें ह्मणोन सांगितलें. बरोबर बाजारबुणगे घेऊं नये. लढाईस सड्या स्वारीनिशीं जाऊन उतरावें. सडी फौज लढाईस पुढें किती गेली ह्मणाल, तर साठ हजार होती. जेथें भाऊंची उडी पडेल तेथें साठ हजारांची उडी पडावी. याप्रमाणें सांगितलें. इतक्यांचा मोड होईल तेव्हां मग खाशांवर पाळी येईल. मग दोन टोळ्या केल्या. खासे अवघे श्रीमंतांपाशीं राहिले.

त्याजवरून दुसरे दिवशीं निजामअल्ली बालेघाटा खालीं उतरून आले, तेथें

एक दोन दिवस झाले. तेथून परांडा किल्ला बारा कोस होता. त्या किल्ल्यावर त्यांणीं बहुत सरंजाम केला होता. निंबाळकर यांजकडे किल्ला होता. जसे आमचे शिंदे, होळकर माठे सरदार, तसे निंबाळकर त्यांचे सरदार. त्यांचा बेत तेथून कूच करून परांड्याचे रोखें जावें. किल्ला पाठीमागें घालून तोंड द्यावें. आपल्यास किल्ल्याचा आश्रय आहे. पेशवे यांस पाठीमागें कांहीं आश्रय नाहीं. याप्रमाणें बेत होता. वकील यांणीं श्रीमंत यांस बातमी लिहिली, उद्यांचा दिवस जाऊन परवां येथून कूच करून परांड्याचे रोखें जाणार त्यास तुम्हीं परवां तेथून घाला घालावा. परांड्याचे रोखें जाऊं देऊं नये. याप्रमाणें पत्रें आलीं. तीं नानांनीं वाचून पाहून श्रीमंतांकडेस दाखविलीं आणि परशराम भाऊंकडे पाठविलीं कीं, याप्रमाणें परवांचा बेत राखावा. त्याजवरून भाऊंनीं पत्रें वाचून पाहून दुसरे दिवशीं संध्याकाळीं तमाम सगळ्या गोटांत ताकीद केली कीं, उद्यां पहांटेची प्रहर चार घटिका रात्र आहे तों स्नानसंध्या भोजन करून दिवस उदय पावत आहे तों सर्वांनीं तयार असावें. सगळ्या लष्करांत जिकडे तिकडे तयारी होत आहे, कोणी जीनबंदी करीत आहे, कोणी भाकरी खात आहे, तों इतक्यांत तिकडून बातमी आली कीं, निजामअल्ली कूच करून चालते झाले. बरोबर सरंजाम भाकरींच्या कंठाळ्या घोड्यांवर भरल्या, पाण्याच्या पखाला उंटावरून घेतल्या, बाजार बुणगे मध्यें घालून मोठ्या आराब्यानें चालले. त्याचें चालणें मिजाशी बहुत, दिवसांतून चार कोस म्हणजे भारी. याप्रमाणें मिजाशी. इकडे परशराम भाऊ यांचें खास पथक आठशें स्वारांची तयारी जाहली होती. बाकी फौज तयार होत होती भाऊंचे. लेक दोघे बरोबर होते, आपा व बाबा. पुतण्या बिट्टलपंत सुभेदार होते ते पुणें मुक्कामीं भाऊंस म्हणत होते कीं, " तुम्हीं सर्वांस पालख्या दिल्या आणि मजला पालखी कां नाहीं ! " मग भाऊ बोलले कीं, " तरवार मारावी आणि पालखी मेळवावी ! " तोही विठ्ठलपंत बरोबर होता. मग भाऊंनीं सगळ्या गोटांत सांगून पाठविलें कीं, आम्ही पुढें तलाव्यांस जातों, तुम्ही मागाहून लौकर यावें.

याप्रमाणें सांगोन आठशें स्वारांनिशीं भाऊ चालते जहाले. खरड्याचे आलीकडे तीन कोस घोडेगांव होता, तेथें लहानशी टेंकडी होती त्याजवरून चढोन खालीं लवणांत निजामअल्ली कूच करून जात होता. त्याजला व यांजला कोसा सवाकोसाचें अंतर राहिलें. भाऊंनीं दुरबीण लावून

---

२८. " बहुत सरदार लोक ठेविले होते. " पाठ भेद.

२९. " दिवस घटकाभर येई तों तयार झालें पाहिजे " पाठभेद.

३०. तलावा=डेहळणी-मागें टीप २६ पहा.

त्यांचे लष्कारांत पाहिलें तों इतक्यांत त्यांची कांहीं दहापांच हजार फौज पुढें वाढली होती. ती त्या डोंगरीचे आड होती ती भाऊंचे दृष्टीस पडली नाहीं. भाऊंनीं आजूस पाहिलें तों जवळ टोळी देखिली. तों भाऊ बोलले कीं ही फौज कोणाची आहे ? तेव्हां समजलें कीं, गनीमाची आहे. ते पुढें आल्याची बातमी होती कीं, परशरामभाऊ म्हणतात ते पुढें आले आहेत. भाऊंची टोळी थोड-की पाहून त्यांणीं पुढें चाल केली. मग भाऊ म्हणों लागले कीं मागें पळावें तरी ठीक नाहीं आणि आमच्या फौजा अजून आल्या नाहींत. तेव्हां भाऊंनीं सांड-णी स्वार मागें जलद पाठविला कीं, तुम्हीं लौकर यावें. आमचें लढाईचें तोंड लागलें. मग भाऊ घोड्यावरून खालीं उतरून श्रीमंतांस साष्टांग नमस्कार घातला आणि बोलले कीं, आतां महाराजांचे पाय समर्थ आहेत. इतकें बोलून घोड्यावर स्वार झाले, आणि दोन हातींचे पट्टे उघडे केले, आणि घोडा पुढें घातला. इतक्यामध्यें गनीमाचे पांचचारशें स्वार पुढें येऊन तेथें हातघाई जुंपली. भाऊंचे १०० स्वार पडले व त्यांचें ५।४ शें. तों इतक्यांत भाऊंचा पुतण्या विठ्ठलराव याणें घोडा पुढें घातला. आणि दोन पठाण मोठे ठार मारिले. आणि मागें परतला तों तिकडून गोळी आली ती उरावर लागली. लागतांच घोड्या-वरून खालीं पडला तो ठार जाहला. हें पाहून भाऊंचे चिरंजीव आप्पा होते, त्यांणीं घोडा पुढें घालून विठ्ठलराव याचा मुर्दा उचलून पालखींत घालून मागें पालखी रवाना केली. जीवंत मेला पाहिला नाहीं. मोहरा गनीम नेईल म्हणोन जलदी केली. तों तिकडून दहापांच पठाण येऊन एकानें भाऊंवर हात टाकिला. तो डोळ्यावर जखम जाहली. दोघे चिरंजीव बाबा व आप्पा यांणीं भाऊंवर हात टाकिला त्या पठाणास ठार मारिला. तों इतक्यांत भाऊ शंभर स्वारानिशीं राहिले. बाकी स्वार पडले. तिकडून बाबा कूच करून जात होते, ते लढाईचें तोंड लागतांच तेथेंच राहिले. इकडे भाऊंचें अवसान गेलें. तों इतक्यांत मागाहून विंचूरकर यांचें पथक व निळकंठराव रामचंद्र परभू पागे होते त्यांचें पतक आलें. आणि विंचूरकर यांचे बरोबर चारशें स्वार होते त्यांस बातमी लागतांच धांवत आले, आणखीं म्हणों लागले कीं, भाऊ कोठें आहेत ? मग भाऊ बोलले कीं, तुमचा बाप होऊन पुढें उभा राहिला आहे. मग असे रागानें बोलले कीं, तुम्हांस यावयास एवढा उशीर काय ? मग तीं दोन्ही पतकें पुढें सरून लढाई बहुत केली. त्याजकडील लालखान पठाण सरदार मोठा होता, तो हत्तीच्या हवद्यांत बसून तिरंदाजी करीत होता. हत्ती ठेंगणा होता. विंचूरकर यांजकडील बारगीर सिपाई तरवार मारणारा चांगला होता, त्यानें घोडा पुढें घालून हत्तीच्या आंगाशीं

---

११. वाढली होती=पुढें आली होती.

भिडोन, हत्तीच्या हवद्यांतील लालखान पठाण खांसा मोहरा पाडिला. तों इतक्यांत त्यांजकडील वजीरखान पठाण सरदार मोठा होता, तो पुढें दहापांच स्वारानशीं धांवत आला. त्याजवर निळकंठराव रामचंद्र परभू हा पुढें जाहला. आणि वजीरखानास ठार मारिलें. मोठे मोहरे त्यांजकडील दोन पडले, व आमचा मोहरा एक विठ्ठलपंत पडला. इतक्यांत बाना फडके दहाबारा हजारांशीं येऊन पोंचले. व जिवबादादा व लखोबानाना व विठ्ठलपंत सुभेदार सगळे फौजानिशीं येऊन पोंचले. हें पाहून त्याजकडील असगूलखानें[१३] सरदार लढत होता तो परतला- पहिली हातघाई तों मागें परतला आणि गोट जेथें थांबला होता तेथें गेला तेव्हां राहिली तोफांचे तडक्यास बारा पंधराशें मुर्दा पडला.

मग जिवबादादा यांणीं तीनशें तोफांचा खटारा पुढें लाविला, आणि बेवीस हजार नळी पळटणाची उभी राहिली. एक बाजूस हुजुरात मानकरी उभे राहिले. व एक बाजूस बिठ्ठलपंत सुभेदार बाणांचा सरमजाम घेऊन उभे राहिले. दिवस सकाळचा सहा घटिका आला. मग तोफा तोफांची लढाई लागली. मग तिकडून गोळे इकडे येऊं लागले व इकडून गोळे तिकडे जाऊं लागले. एकच तडाका तोफांचा उसळला. संध्याकाळचा दिवस सहा घटिका राहिला, एकच मारा जाहला. इतक्यांत त्यांजला वारा सोईचा होता धूर आमचे लष्करांत येऊं लागला. मग भाऊ बोलले कीं, वारा जर कृपा करील तर बरें आहे. मग भाऊंनीं श्रीमंतांचें स्मरण करून वाऱ्याची प्रार्थना केली कीं, महाराजांचें पुण्य आहे तर तूं कृपा कर. असें म्हणतात एक दोन घटिकेंत वारा तिकडे फिरला. धूर इकडे येत होता तो तिकडे जाऊं लागला. मग भाऊंस अवसान आलें. मग भाऊ म्हणों लागले कीं, वाऱ्यानें कृपा केली आतां भीत नाहीं. मग राजश्री सखारामपंत पानसे यांस पुढें बलावून सांगितलें कीं, थोरल्या तोफा तोफखान्याच्या पुढें आणाव्या. पलटणी तोफांनीं काम होत नाहीं. मग सखारामपंत पानसे यांणीं सतरीं[३३] तोफा पुढें ओढिल्या. त्या तोफा बहुत मोठ्या होत्या. एक एक तोफेस बैल दोनशें ओढावयास लागत अशा होत्या. त्या तोफा सुरू होत तों अस्तमान जाहला. मग त्या तोफा सुरू जाहल्यावर दणाण झाला. तिकडे अस्तमान होतांच मशाला लागल्या. हवयांचा उजेड पुढें बहुत पडला. मग विठ्ठलपंत सुभेदार यांणीं बाणांचें छत करून सोडिलें. आणि जशी परजन्य वृष्टी होते, त्याप्रमाणें बाणामागें बाण सोडून एकच मार केला. आणि सर्वांनीं एकदांच हरहर महादेव ! करून एकदांच उड्या घातल्या. मोठी लढाई मातबर जाहली. अशी रात्र प्रहर होई तों

१२. याजबद्दल 'अदलीखान' असेंही आहे.

१३. 'स्वतंत्र' पाठभेद.

मोठी ख्याती लढाईची जाहली. जिवबादादा यांणीं मोठी मर्दुमी केली. माणसें पडलीं त्याची संख्या त्या वेळेस राहिली नाहीं. आमचे तर्फेनें गोविंदराव काळे वकील तिकडे होते, त्यांणीं नबाब यांचे लष्करांत फितूर केला. पठाण चाळीस हजार पुढें तोंडावर लढत होता, तो फितूर होतांच पठाण मागें पाय घेऊं लागले बाय बार करूं लागले. मग नबाब यांणीं पाहिलें कीं, आपले लष्कारांत फितूर दि-सतो, पठाण तुटून पडत नाहींत. असें पाहून जरिपटका नबाब यांणीं फिरवि-ला. निजामअल्ली याची बुद्धि फिरली. श्रीमंतांचें दैव थोर म्हणोन, ईश्वरीअवतार म्हणून त्या वेळेस यश आलें. नबाब मागें फिरतांच मश्रूलमुलूख दिवाण पुढें तोंडावर त्यांणीं मागें पाहिलें तों खासे फिरले, जरिपटका फिरला. हें पाहून मश्रुलमुलूख फिरले, आणि पळत चालले. आमची फौज आंगावर मारीत चालली तों दोन कोस अंगावर गेली. तोफखाना त्यांचा लुटून आणिला पेंढारी यांणीं त्यानकडील घोडे, राऊत, थकले असें पाहून शेले पागोटीं लुटून घेऊं लागले. पेंढार यांणीं एकच घाई केली. नबाब यांणीं मागें जाऊन खरड्याच्या गढींत खासे शिरले. आणि जासुदाबरोबर चिठ्ठी पाठविली कीं, " रावपंडित प्रधान नय असे. लढाई महकूब करावी. आम्ही तहाचें बोलणें लावितों, तुम्हीं जें मागाल तें देतों, शरण आहों." याप्रमाणें जासूद, सांडणीस्वार व भालदार बोलावयास आले. मग भाऊ बोलले कीं, हल्ला करून लुटून घ्यावें, पहातां काय ! तों इतक्यांत गोविंदराव काळे वकील त्यांजकडे होते, त्यांणीं चिठ्ठी लिहिली कीं, "नबाब शरण आले त्यांस मरण द्यावयाचें नाहीं. यांचा आपला भाऊपणा आहे. यांणीं या समयास आपल्यावर स्वारी करूं नये. बरें असो. तुम्हीं लढाई महकूब करावी करीत नसल्यास शिक्के कटार पाठवितो." याप्रमाणें लिहिलें वकील यांचें आलें. मग भाऊंनीं लढाई महकूब केली. तो इतकियांत दुसरी चिठ्ठी वकील यांची आली कीं, " लढाई महकूब करविली खरी, परंतु नबाब हे रोखून बसले आहेत. रात्रीं लढाई महकूब करून सकाळीं पुन्हा लढाईचें तोंड द्यावें असा बेत दिसतो. आपल्यास पाणी नाहीं. डोहो पाण्याचा त्यांणीं राखिला आहे. त्याजकडे सांगून पाठवावें कीं, तुमच्या मनांतून सल्ला करावयाचा असल्यास पाणी आमचें स्वाधीन करावें. नाहीं तरि आतांच हल्ला या वेळेस करितों." असें सांगून पाठविलें. तों त्याजवरून तो अडला. रात्रीचा विषय पडला. म्हणोन त्यांणीं आपली फौज पाण्यावरून उठविली. मग आम-चा कंपू पाण्यावर जाऊन उतरला. मग भाऊंनीं फौजेच्या चार टोळ्या करून त्यांची फौज मधी घालून उतरले. नबाब खासे मात्र गढींत शिरले होते, फौज दरोबस्त बाहेर होती. नबाब यांचे बरोबर चारण यांचे बैल चाळीस-

हजार दाण्यांनीं भरलेले होते, ते पेंढार यांणीं लुटून पेशव्यांच्या लष्करांत आणिले. त्यांस दाणा व पाणी नाहीं. लोटाभर पाणी निजामअल्ली यांचे लष्करांत द्यावें आणि एक रुपया घ्यावा व शेरभर पीठ द्यावें आणि रुपया घ्यावा. अशी याप्रमाणें त्यांची अवस्था केली. नबाब यांचें तहाचें बोलणें लागलें. तों प्रातःकाळ जहाला.

परशरामभाऊ यांचा पुतण्या विठ्ठलपंत सकाळचे सहा घटिका दिवसास लढाईंत पडला, व भाऊंस जखम लागली त्या वेळेस भाऊंनीं हातचिठ्ठी नानाकडे मागें लिहून पाठविली कीं, " आमचा गळाठा फार आहे, स्वारीची गोष्ट कठीण दिसती." मग नानांनीं चिठ्ठी पाहून नानांचेंही अवसान गेलें. नानांनीं लौकर भोजन करून, प्रस्थान बरोबर घेऊन, सरकारचे व नानांचे मध्यें डेरा पेंठे यांचा होता, तेथें प्रस्थान देऊन सरकारचे डेऱ्यास आले. तों श्रीमंत जेऊन उठावयास जहाले होते, इतक्यांत नाना आले. मग देवघरचे राहुटींत गालीच्या टाकून श्रीमंत व नाना व आपा बळवंत व गोविंदराव पिंगळे असे तेथें बसले. आणि नानांनीं भाऊंकडील चिठ्ठी आली होती ती श्रीमंतांस दाखविली, आणि विनंती केली कीं, "येतांना पेंठ्यांचे डेऱ्यास प्रस्थान ठेवून निघोन आलों आहों. पुढें सड्या स्वारींत जावयाची आज्ञा असावी. कारण भाऊंचा गळाठा बहुत आहे, म्हणोन जावयाचें." हें बोलणें नानांचें ऐकोन श्रीमंत बोलले कीं, पुढें जाण्याचें कारण काय ? संध्याकाळपर्यंत गलिमाचा फडशा होतो, न जाहला तर तुम्ही व आम्ही बरोबरच जाऊं. पुढें जावयाचें कारण पडत नाहीं. संध्याकाळ पर्यंत स्वारी फत्ये होती, संशय नाहीं." महाराजांचें उत्तर ऐकोन नानांनीं विनंती केली कीं, " आपण बोलत नाहीं, भगवान् गोपाळ कृष्ण बोलत आहेत ! आपण ईश्वरी अवतार आहांत. आपल्या मुखांतून निघेल तें प्रमाण." नानांचे मनांतून पुढें जावयाचें नव्हतें, परंतु महाराजांचे मुखांतून काय निघतें तें पहावें. मग श्रीमंत व नाना कचेरीच्या डेऱ्यांत जाऊन बसले. तों इतक्यांत शिंदे व होळकर व भोंसले खासे अवघे श्रीमंताजवळ येऊन बसले. अवघ्यांच्या डांका सांडणीस्वारांच्या होत्या. घटिके घटिकेची बातमी कळत होती. संध्याकाळ जाहला. मग शिंदे व होळकर व भोंसले जेवावयास जावयाचा निरोप मागूं लागले, मग श्रीमंतांनीं उत्तर केलें कीं, " आज निरोप कोणास द्यावयाचा नाहीं. खाशांनीं अवघ्यांनीं आमचे पंक्तीस जेवावयास रहावें. खाशी मंडळी पंक्तीची असेल ती निवडून बाकी फौजेस निरोप द्यावा. शेवट पर्यंत काय वर्तमान लढाईचें येईल तें पाहूं, नाहीं तर याच पायीं पुढें जाऊं." मग खांशी मंडळी पाहिली तों

सहाशें असामी खांसे मात्र राहिले. मग वांकनीस यांस बलावून सांगितलें कीं, स्वयंपाक लवकर करावा. मग वांकनीस यांनीं दहा, पांच आचारी लाऊन स्वयंपाक करविला. तों रात्र सहा घटिका जहाली. नंतर भोजन होऊन कचेरीस डेऱ्यांत आले. तों रात्र दहा घटिका जाहली. तों इतक्यांत लष्करचें खुशालीचें वर्तमान अकरावीचे अमलांत बाबा फडके यांचा सांडणीस्वार घेऊन आला. फडके यांणीं चिठी लिहिली कीं, "नबाब कोसभर मागें हटले. आम्ही आंगावर मारीत चाललों आहों. पेंढार यांनीं त्यांची खराबी बहुत केली." हें खुशालीचें वर्तमान ऐकून सांडणीस्वारास सोन्याचीं कडीं व पोषाख बक्षीस दिला. पुढें तेरावीचे अमलांत जिवबा दादा यांचा सांडणीस्वार खुशालीचें वर्तमान घेऊन आला. जिवबा दादांनीं चिठी लिहिली कीं, "निजामअल्ली दोन कोस मागें हटले. आणि त्यांचा तोफखाना आम्हीं लुटून आणिला आहे. स्वारी फत्ते आहे." हें ऐकोन सांडणीस्वारास शेरांचें कडें सोन्याचें बक्षीस दिल्हें, व पोषाख दिल्हे. पुढें पंधरावीचे अमलांत परशराम भाऊ यांचा सांडणीस्वार खुशालीचें वर्तमान घेऊन आला. भाऊंनीं सकाळची चिठ्ठी गलबलीची लिहिली होती, व हल्लीं खुशालीची चिठ्ठी लिहिली कीं, "तीन कोस निजामअल्ली मागें हटून खर्ड्याच्या गढींत शिरले, आम्ही आंगावर मारीत गेलों, व तेथें फौजेच्या चार टोळ्या करून त्यांची फौज मध्यें घालून सभोंवता वेढा देऊन उतरलों. नवाब यांचें तहाचें बोलणें लागलें आहे. स्वारि फत्ये आहे." याप्रमाणें चिठ्ठी पाहून घेऊन सांडणीस्वार भाऊंचा आला होता, त्या स्वारास सोन्याचीं कडीं दोन व पोषाख बक्षीस दिल्हा. मग नानांनीं वांकनीस यास हाक मारून सांगितलें कीं, "साखरचीं पोतीं आणून साखरा वाटाव्या, व तोफखानाही सोडावा." म्हणोन हुकूम जाहला. मोठी खुशाली जाहली. मग सगळे खांसे उठोन निजावयास गेले.

तिकडे निजामअल्ली यांजकडून तहाचें बोलणें लागलें होतें त्यांनीं बोलतां बोलतां चार दिवस धीर धरिला. त्यांचे लष्करांत घोडा व माणसें पांच हजार महर्गता म्हणून मेलीं. शेरभर पीठ व लोटाभर पाणी रुपयाचें. मग त्याचे सरदार त्यास बोलूं लागले कीं, "तुम्ही लढाई करा अथवा तह करा आणि ते मागतील तें द्या, परंतु असें आम्हांस अन्नापाण्याविरहित कां मारितां!" असें त्यांचे सरदार त्यांस बोलूं लागले. मग नबाब यांणीं आमचे वकील गोविंदराव काळे यांस बलावून विचारिलें कीं, "तुमची मर्जी काय घ्यावयाची आहे तें बोलावें. किंवा आम्हांस लुटून घ्यावयाचें असल्यास लुटून घ्यावें" मग गोविंदराव काळे यांणीं उत्तर केलें कीं, "श्रीमंतांकडेस लिहून पाठवितों आज्ञा

त पहातांच भाऊसाहेबांनीं फौजे सुद्धां आपला अंबारीचा हत्ती फौजेंत लोटला. तेव्हां डावी टोळी विश्वासराव साहेबांची होती, ती बेजरब उठली. उजवेकडून जनकोजी शिंदे कमरग्यांत शिरून मोठी मारामार जहाली. शरसंधान अगदींच राहिलें. निमचे व समसेरा चालूं लागल्या. तीन चार तास पर्यंत एकच घाई शस्त्रसंधानाची झाली. मुर्दावर मुर्दे पडूं लागले. वीरांच्या नजरा फिरोन गेल्या. आपपर कोणी ओळखेनासे जहाले. वीर रणांमध्यें माजले. रणमद चढला. त्यांशा त्यांशांचे हींदे एकास एक लागून जोरावारीनें लढों लागले. केवळ दशाग्नी शताग्नीशीं भीडूं लागले. ते समयीं सदाशिवपंत [यांणीं] अंबारींतून उतरून, दोहों हातीं पट्टे घेऊन, नीट फौजेंत चालून घेतलें. तेव्हां नामी नामी सरदार व धारकरी नांवाजिनांवाचे यांणीं जीवित्वाची तमा न धरितां बेलाशक हैदोसेंच केली. कोणास क्षतें वर्मीं लागलीं, ते विष्णुलोकास गेले. व कोणीं रणांगणीं मुर्छित पडले. व कोणांची शिरें तुटोन धडांवेगळीं झालीं. व कोणासीं उदरें फुटोन अंतरमाळा लोंबूं लागल्या. परंतु अणुमात्र कोणीं लढाई विषयीं कसर केली नाहीं. एकच गर्दी होऊन गेली. त्यांत विश्वासराव साहेब अगदींच गर्दींत गर्द होऊन गेले. तेव्हां सदाशिवपंत पाय उतारा होते ते घोड्यावर स्वार होऊन सैन्यांत मिसळले. मोठी तरवार करून विश्वासराव साहेब अंबारी सुद्धां संभाळून माघारें आपले जमातींत पौंठविले. परंतु कायम आहेत किंवा वैकुंठवासी जहाले याचें वर्तमान पुरतेपणें लागलें नाहीं. आपण तसेच पुढें चालून गेले. तेथें नामी नामी लोक दोन हजार ठार पडले. इराणीनें नामोहरम होऊन पाठ दिली.

त्या युद्धांत इकडील व तिकडील एकंदर चाळीस हजार लोक कामांस आले. खेरीज केवळ जखमी लोक दहा हजार. याप्रमाणें युद्ध जहालें. या मागें या

---

५८-५८. याजबद्दल प्र० १।२ मध्यें "ते समयीं इराणीच्या फौजेंत मोठी कहवी" इतकेंच आहे.

५९. बेजरब=बेलाशक, निर्भयपणें मागें पुढें न पहातां.

६०. कमरगा=मध्य प्रदेश, बाजू.

६१. प्र० १ शिवाय सर्व प्रतींत 'मरूं लागले' असें आहे. 'दशाग्नि शताग्नीशीं' याचा अर्थ बरोबर समजत नाहीं. सर्व प्रतीचा पाठ एक सारखाच आहे. 'दशाग्नी शतघ्नी अशा शस्त्रांनीं मारूं लागले' किंवा 'दहा दहा गोळ्या (अग्नि) शंभर शमर गोळ्या लागून मरूं लागले' असा कदाचित अर्थ संभवेल.

६२-६२. याबद्दल 'चालून घेतलें. रकांबर लोक झाले' असें प्रत ३ मध्यें आहे.

६३. 'यमसदनास' प्र० ३.

६४. अंतरमाळा=अंत्रमाला=आंतड्यांचीं वेटाळीं.

६५. 'आणिले' प्र० ३.

६६. 'मोहरम' प्रत १ 'नाबूद' प्रत २.

६७. कामास आले=पडले.

कलियुगीं असा योद्धा कोणी जहाला नाहीं. पुढें ही होणें जरूर. भारती युद्धा समान सदाशिवपंतांनीं युद्ध केलें. या कलयुगीं मानव कृतींत ब्राह्मण कुळांत जन्म घेऊन पराक्रम थोर केला. धन्य त्यांची जननी कीं असा पुत्र प्रसवली ! येणें करून सत पुरुष उद्धरून त्रिगुलोकास गेले. धन्य त्या पुरुषाचा पिता ! त्यास साम्यता दशरथाची, किंवा पंडूची ! चिमाजी आप्पाची धन्य कीं हा पुत्र रामाप्रमाणें निर्माण जहाला. हें युद्ध पाहून स्वर्गी इंद्र व देवगण व गंधर्व स्तुति करूं लागले कीं मानवी होऊन, जातीचा विप्र असतां, प्रताप कर्णाप्रमाणें केला ! ! केवळ राम रावण यांच्या युद्धा समान युद्ध झालें. इराणीकडील लोक तीस सहस्त्र कामास आले व आठ हजार जखमी जहाले. शिवाय घोडीं वीस हजार, उंटें सातशें व हत्ती दोनशें, येणें प्रमाणें अमित्राकडील तळावर राहिले. भाऊसाहेबांकडील नामी सरदार व धारकरी, एकाण्डे हुजरातीचे लोक वीस हजार ठार पडले. शिवाय उंटें पांचशें व घोडे पंधरा हजार व हत्ती नग सत्याशीं. ऐसा संग्राम जहाला. मुख्य अबदल्लीचा पुत्र तेमूरशहा बहादर व नजीमखां वगैरे आतबर पठाण व रोहिले हक्क होऊन गेले. खांसे सुजातदौले यास चार जखमा जहाल्या. इराणीचे फौजेनें शिकस्त खाऊन माघारी फिरली. अवघींच अगदीं खस्ता जालें. भाऊंनीं सेना सहित पिच्छा पुरविला आणि इराणीच्या गोटांत फौज नेऊन घातली. एकीकडे पठाणांची टोळी होती ती नेस्त ई नाबूद केली. सदाशिवराव भाऊ अभिनव यश पावले. आनंदसागरास पारावार नाहीं. शत्रु पराभवातें पावून, भाऊसाहेब व विश्वासराव साहेब उभयतां आपआपल्या अंबारींत बसून, महागर्जना करून रणतुरें व नौबती आणखी जय वाद्यें वाजवीत आपले गोटांत चालिले. एकच सिंहनाद झाली. + त्यांची फौज शिकस्त खाऊन मागें गेली. त्यासंधींत मागें अबदअल्ली पन्नास हजार फौजेनिशीं आपले गोटांत तयारच होता, त्याचे पुत्र उभयतां लढाईंत हक्क जहाले, त्यांचे वर्तमान

६८. जरूर=करीण, अशक्य.

६९. जेथें जेथें 'भारती. समान' असें पाहिजे तेथें तेथें अनेकदा 'भारथी भारथ' असें मुळांत लिहिलेलें आहे. प्र० १-२ मध्यें 'भारती समान' इतकेंच आहे.

७०. 'केला' प्रत २.

७१. 'एकुन लढाया चार' असें या वाक्यापुढें प्रत १ व २ मध्यें आहे.

७२. हक्क होणें=पतन पावणें.

७३. शिकस्त खाणें=पराजय पावणें.

७४-७४. हीं वाक्यें प्र० १।२ मध्यें नाहींत.

* खस्ता=षट.

§ नेस्तनाबूद=नाहींशी.

७५-७५. हें वाक्य प्रत १।२ मध्यें नाहीं.

+ यत्रथे प्रतीस येथपासून जी जी उपलब्ध आहे त्याच्यांत अगदी भिन्न मजकूर आहे. हिचा व दुसऱ्या तीन प्रतींचा येथपासून मुळींच मेळ पडेना, सबब तो मजकूर स्वतंत्र पुढें देऊं.

श्रवण करून वाईटपणाचें ऐकतांच अबदल्ली यानें फौजेसहवर्तमान या अल्ला ! या खुदा ! या रहिमान ! याप्रमाणें देवाचा धांवा करून, जीवित्वाचा संकल्प[७६] सोडून, एकदांच वाद्यें वाजवून फिरून सदाशिवपंतावर चाल केली. तेव्हां भाऊसाहेब यश संपादून आपले गोटांत जात होते. इतक्यांत शत्रु पाठीवर आला, हें वर्तमान कळतांच महातास सांगून खांशाचे हत्ती माघारे फिरविले. तें संपूर्ण फौजेनें पाहून सर्व लढाईच्या प्रसंगीं[७७] नीट चालिले. लढाई सुरू होतांच विश्वासराव साहेब अंबारींतून तिरंदाजी करीत होते, एवढ्यांत कोणी दुष्टानें बंदुकीची जोडगोळी घातली. ती हृदया पार होतांच विश्वासराव साहेब लागलेच वैकुंठवासी जहाले. तेव्हां त्या महातानें व जो खवासखान्यांत[७८] चौरीबारदार[७९] होता त्यानें कमरेचा दुपेटा काढून, विश्वासराव साहेबांस अंबारीचे खांबाशीं दृढ बांधून बसलेचे बसले तीर कमाणी सुद्धां तसेच ठेविले. पुढें लढाई होतच होती. या आकांताचें वर्तमान उजवे बाजूस भाऊसाहेब होते त्यांस विदित जहालें.

नंतर भाऊसाहेबांनीं आपला अंबारीचा हत्ती खालीं बसवून, विश्वासराव साहेब यांचे हत्तीजवळ जाऊन,[८०] तो हत्ती बसवून, रायाचें शरीर छिन्नभिन्न जहालें होतें तें दृष्टीनें पाहून परम दुःख जहालें. तें पत्रीं लिहिणाराची कल्पना[८१] कुंठित जहाली. श्रीराम अयोध्यापूर सोडून वनवासास जावयास सिद्ध जहाले, तें वर्तमान ऐकतांच दशरथानें कैकेयीच्या मंदिरांतच अंतर्धान केलें, तसेंच भाऊ साहेबांस जहालें. तेव्हां मल्हारजी होळकर यांस आज्ञा जहाली कीं, "तुम्ही पुण्यास जावें. बरावर आमचें कुटुंब व इतरांचे कबिले[८२] घेऊन जाऊन, श्रीमंत नानासाहेबांस "वै श्रीमंत सौभाग्यवती गोपिकाबाई साहेब यांस माझे साष्टांगीं[८३] नमस्कार सांगून विज्ञापना माझे तर्फेनें करावी. तुमचे चिरंजीव विश्वासराव साहेब व भाऊ साहेब तीन लक्ष सेनेसहित इंद्रलोकीं सुखरूप आहेत. कांहीं चिंता न करावी. उभयतां वडिलांनीं आजपासून लोभ चिरंजीव माधवरावसाहेबावर करीत जावा. पुढें कांहीं दिवसांनीं त्यांचे हातून संपूर्ण शत्रु लयास जाणार. मी परशुराम अवतार आणि चिरंजीव माधवराव साहेब केवळ अर्जुनाचा अवतार. आमचा संकल्प यांचे पराक्रमानें परिपूर्ण होणार. याप्रमाणें सांगितलेलें वर्तमान नानासाहेबांस व सौभाग्यवती बहिनीबाईस श्रुत करावें.

---

७६. जीवित्वाचा संकल्प सोडणें=जीव देण्यास तयार होणें–जीवावर उदार होणें.

७७. 'प्रसंगें' प्रत ३.

७८. खवासखाना=अंबारीच्या पाठीमागें खिजमतगाराची उभी राहण्याची जागा.

७९. चौरी-बारदार=चामर-धर.

८०. प्र० १ व २ मध्यें 'जाऊन' हा शब्द नाहीं.

८१. 'कलम' प्र० ३. कलम=लेखणी.

८२. कबिले=बायका, कुटुंबें.

८३–८३. हे शब्द प्र० १ व २ मध्यें नाहींत.

कदाचित् शत्रूंनीं तुमचा पिच्छा पुरविला असतां आमच्या कुटुंबाचा शिरच्छेद तुम्हीं आपले हातीं करावा, परंतु शत्रूंचे हातीं जीवंत लागूं देऊं नये." तसेंच जनकोजी शिंदे यांस सदर्हू अन्वयें निरोपण जहालें. शिंदे मजकूर यांणीं उत्तर केलें कीं, "मी पुण्यास माघारा जावयाचा नाहीं. खावंद जर. माघारे पुण्यास येतील तर मी जाईन. नाहीं तर जेथें खावंदाचा जोडा पडेल तेथें माझें शिरकमल पडेल ! यांत तिलमात्र अंतर नाहीं." तें ऐकून समागमें स्वारी बरोबर गंगोदकाच्या कुप्या चालत होत्या त्या सदाशिवपंत भाऊंनीं आणवून, खालीं गाशा घालून शेलापागोटें, जामानिमा, ढालतरवार, सुद्धां सचैल स्नान करून, एके कुपीचें उदक प्राशन केलें आणि उत्तर केलें कीं, "आमचें पारणें जहालें ! " मग मल्हारराव होळकर यांस रामराम करून, "आतां लोभ असो द्यावा," असें बोलोन हयपान घोडा अर्बी होता. तो आणवून, वर स्वार जहाले. एवढ्यांत होळकर वगैरे यांणीं विनंति केली कीं, "एवढे हट्टास पडावयाचें कारण नाहीं. आपण उज्जनीस साल मजकुरीं छावण्या कराव्या. पेस्तर सालीं शत्रु आपण पहातच आहों. पुण्यास जावयाची खावंदास शरम वाटेल तर आलीकडे गंगीं अथवा नर्मदा अथवा क्षिप्रा एवढ्यास्थळीं मुक्काम वर्ष सहा महिने करून, सर्व सरदार, घोडे, हत्ती व उंट व तट्टे, पायदळ, व तोफखाना यांचे बैल व अवांतर सेना खाऊन पिऊन हुशार होऊन पेस्तर सालीं दुसमानची खबर घेऊं ! हिंदूचे मुसलमान होऊं परंतु छत्रपतीचें नांव राखूं यांत अंतर नाहीं ! ! आणि आपण कांहीं पदरचे सरदार यांचे ऐकत जावें. कारण पेशजी साष्टी, वसई कैलासवासी चिमाजी आपा यांणीं फत्ते केली. आणि प्रतिज्ञा मोठीच केली होती परंतु चौघां सरदारांचे मतें कोणतीही एखादी गोष्ट शेवटास नेत. तसेच आपण वर्तावें." तेव्हां भाऊसाहेबांनीं उत्तर केलें कीं, "चिरंजीव विश्वासराव साहेब गोळी लागून कामांस आले. आतां आपण मोठा पराक्रम जरी करून पुण्यास गेलों तरी सौभाग्यवती गोपिकाबाई साहेब माझें मुखावलोकन करणार नाहींत. कारण त्यांचे केवळ जिवाचे जीव विश्वासराव साहेब ते लढाईंत पडले असतां त्या वडिलांचे भेटीस आपण जावें हें अयोग्य."

एवढ्या संधींत मलका जमानीनें बिबीसाहेब, दिल्लीश्वराची बादशहा जादी, हिणें जी फौज दुसमानचे बादशाहाकडून कुमकेस दुराणी व दुराणी, गिलचे नादिरशाह व तैमूरशाह वगैरे आली होती त्यांस पदर पसरला कीं, "तुम्हीं

८४. गंगा=गोदावरी.
८५. प्रतिज्ञा—पेशव्यांची बखर पृ० ४२ पहा.
८६. 'नेली' प्र० १ व २.
८७. कामास आले=ठार झाले.
८८. भाऊ साहेबांची बखर पृ० १२ व २४ पहा.

जर लढाईस कमकसर केली तर दिल्लीचे बादशाह फकीर होऊन देशांतरास जातात. हें समजून एक वेळ आणखी लढाई रणखंदल करावी. त्यांत खुदानें यश दिल्यास पुनः दिल्लीस जाऊं. नाहीं तरि दिल्ली सोडून परागंदा होऊं. तुमचे लष्करासन्निध उतरलों आहों. मुसलमानी बादशाहीची शरम ठेऊन बेजरब लढाईस भिडावें. बारग्यांची फौज दरवर्षी येऊन बादशहास इजा देऊन, घासदाण्याचे ऐवजीं खंडण्या घेतात, आणि रात्रंदिवस बादशहा दिलगीर होतात, हें दुःख सोसवत नाहीं. आपण बादशाहत करूं अथवा बारगे करतील हाच संकल्प!" तेव्हां सरदारांनीं तसलिमात करून, बिबीसाहेबांचा हुकूम घेऊन, एकदांच घोड्यांच्या अनीना उठवून मोहळांच्या माशा उठतात त्याप्रमाणें सर्वत्रांनीं उडी घातली. तोफा व बंदुका आणि बाणांच्या कैच्या व गरनाळा आदि करून अगदींच राहिल्या. तरवार चालती जहाली.

तेव्हां राव भाऊंनीं त्या रोहिल्या प्रमाणेंच उडी घातली. पहिल्या लढाईच्या वेळेस सव्वा चार लक्ष फौज गणतीस लागली होती. त्या आलीकडेस सर्व सैन्य लढायांत खपून तीस सहस्र घोडा स्वार शिलक राहिला. त्या सुद्धां भाऊसाहेबांनीं उडी घातली. तेव्हां [भाऊ] केवळ कल्पांतींचा आदित्य भासला. ग्रीष्म ऋतूच्या दिवसांत मेघाचे ढग उठतात आणि विद्युल्लता चमकून लागलीच नाहींशी होते, त्याप्रमाणें भाऊसाहेबांनीं संभ्रमांत उडी घातली ते समयीं सर्वांस दिसले. तिकडील खांसा अबदल्ली व मनसूरअल्ली व सुजातदौले, इराणीकडील नादिरशाह, तंबूरशाह वगैरे उरल्या फौजे सहित त्यांणींही उडी घातली. ते समयीं श्रीहरी त्या अमित्राकडील फौजेस सन्मुख जाहला. श्रीमंत[१३] पेशवे बहादूर यांस विन्मुख झाला. याजमुळें सर्व नाश जाहला.

हत्ती घोड्यांनीं व उंट तट्टांनीं संपूर्ण खंदक भरला. खंदक भरल्यावर जे लोक भिकारी होऊन अन्न अन्न करीत दुसरीं वेशधेंरून पुण्यास आले ते आले. कितीकांचे तोतये जहाले. हजारो हजार त्या कुरुक्षेत्रीं रणमंचकीं निजलेच राहिले. पुढें असा संग्राम होणें कठीण आणि अशा पुण्यभूमीस मरणही येणें कठीण. त्यांत धारातीर्थ भाऊसाहेब केवळ परशुराम अवतार, लढाईची या मृत्युलोकीं कीर्ति करून, मोठमोठ्या शैत्रूंचीं पारिपत्यें करूंनें, मरण काळपर्यंत नानासाहेबांची

---

८९. बेजरब=निर्भयपणें, धास्ती न खातां.

९०. बारगे=मराठे मागें पृ० १७ टीप १८ पहा.

९१. तसलिमात=प्रणाम, सलाम. प्र० ३ मध्यें ह्या शब्दाबद्दल "मान तुकावुन" असें आहे.

९२. अनीन=कण्ठरज्जु, लगाम.

१३–१३. हें वाक्य प्र० १ व २ मध्यें नाहीं.

१४–१४. हे शब्द प्र० १ व २ मध्यें नाहींत.

१५–१५. ह्याबद्दल '•शत्रूंचे नक्षे उतरून' असें प्र० ३ मध्यें आहे.

आज्ञा न उल्लंघितां, दररिकिबीसें तरवार फत्ते करून, जन्मप्रभृति जय संपादून शके १६८२ विक्रमनामसंवत्सरीं मंगळवारीं पौष शुद्ध २ अवतार संपविला. ते दिवशीं मागील चारघटिका दिवसास सूर्य असतांच अंधःकार पडला. रण रात्रीस हा कालपर्यंत घुमत असतें.

तें तहकीक वर्तमान एक बारनिशींनीं डाके बरोबर पुण्यास नानासाहेबांस लिहून पाठविलें. वर्तमान नानासाहेबांनीं श्रवण करून भाऊसाहेबांची बहुत खंती करूं लागले. रात्रंदिवस जेवितां व स्नान संध्येंत व कारभाराचे कचेरींत, व झोंपेंत भाऊ! भाऊ! म्हणून दचकून उठूं लागले. केवळ भाऊसाहेबांचें वेड लागलें. "हाय! हाय! भाऊ! माझे दृष्टीस केव्हां पडशील? केव्हां भेटशील? माझा पुत्र विश्वासराव गेला. त्याचें मला फारसें स्मरणही होत नाहीं. परंतु भाऊसाहेबांनीं मला मागें टाकून आपण स्वर्गवास केला. माझे अंधळ्याची काठी चोरून नेली! माझे धनाचीं चरू कोणीं चोरून नेला तो कळेना!! आतां प्रपंचांत राहून कांहीं एक नफा नाहीं. आतां देहत्याग करावा अथवा संन्यास घ्यावा अथवा वैराग्य घेऊन जिकडे भाऊसाहेब गेले तिकडे जावें. हा हेतु यापरता दुसरा विचार नाहीं. असा शोक जहाला."

तदनंतर सर्व कारभारी यांणीं परोपरी विज्ञापना केली. तथापि नानासाहेब शोकार्णवीं पडोन भ्रांत जहाले. अन्न, पाणी, तांबुल, विलास, नृत्य, कारभार व कोणत्याही गुणें करून व कोणत्याही विषयें करून मनीं शांत होईना. सबब पुणें मुक्कांमींहून दुसरी फौज पुणें संस्थानिंची होती ती सिद्ध करून, भाऊसाहेबांचें उसनें घ्यावें या कारणास्तव हिंदुस्थान प्रांतीं मोहिमेस चालले. कोण्या कारभाऱ्यांचें पुढें चालेना. रामचंद्रासाठीं भरतानें अयोध्यापूर सोडून नंदिग्रामीं राहून वैराग्यवत, उदास जहाले; तद्वत् राव नानांनीं आरंभिलें. मजल दर मजल करीत चालले. खेचेवाडे पर्यंत गेले. तेव्हां कोणे एके दिवशीं रात्रीं भोजन करून मजलसीस बसले असतां रायास भाऊसाहेबांचें स्मरण जहालें. तेव्हां गहिंवर येऊन अश्रुपात करूं लागले. इतक्या समयांत कोणी कलावंतिणी नृत्य करावयास आल्या. त्यांनीं उत्तम प्रकारचें गायन करून रायाची मर्जी सुप्रसन्न केली. तेव्हां साहेबांनीं म्हटलें कीं, "जी इच्छा असेल ती आज मागावी, मी देईन."

---

९६. दररिकीबीस=क्षणोक्षणीं, पुनः पुनः

९७. "तो दिवस शके १६८२ पौष शुद्ध ८ बुधवासर होता." असें भाऊ साहेबांच्या बखरींत आहे. (पृ० ११९.)

९८. "बारसनिसानें व वकिलानें" प्रत २.

९९. "माझे निधनाचे (निर्धनाचे!) धनाचा चरू०" प्र० २.

१००–१००. '०मुक्कामीं दुसरी फौज होती ती' प्र० २.

१. मजलस=सभा, कचेरी.

अशी आज्ञा जहाली तेव्हां त्या कलावंतिणीनें पुढें पदर पसरून अर्ज केला कीं, " आपण दक्षिणचे ब्राह्मण बादशाह, ज्या ठिकाणीं भाऊसाहेब गेले आणि गर्क जहाले तें ठिकाण आपण दृष्टीनें पाहूं नये. व खावंदानीं मोहिमेस स्वतां जाऊं नये. दुसरे सरदार पाठवून शत्रूंचीं पारिपत्यें करावीं. हेंच आम्हांस बक्षीस द्यावें. आणखी कोणे गोष्टीची इच्छा नाहीं. सर्व कांहीं खावंदाचे चरण-प्रतापें करून आम्हांस घरीं अनकूळ आहे." त्या समयीं पुरंदरे वगैरे ब्राह्मण मंडळीं कारभारी व मराठे व मुसलमान सरदार यांणीं रायास विनंती केली कीं, " महाराजांनीं इच्छा असेल तें मागावें, मी देतों, असें वचन दिलें; त्यापेक्षां हें बक्षीस त्या कलावंतिणीस देणें प्राप्त, अशा भागास गोष्ट आली. याजवर धनी समर्थ आहेत.". याप्रमाणें सर्वांचीं भाषणें रायांनीं श्रवण करून माघारां ढाला फिरविल्या.

फिरून स्वारी पुण्यास येऊन विक्षिप्त भाऊसाहेबांचे वियोगें करूनच जहाले. काम कारभार कार्याकारण होऊं लागले. गादीवैर बसणें त्याचाही त्याग केला. दिवसेंदिवस शरीर कृश झालें. इहिदे सितैनांत ज्येष्टमासीं नानासाहेबांनीं कैलास-वास केला.

भाऊसाहेब व जनकोजी शिंदे, यशवंतराव पवार व आपाजी जाधवराव व बापूजी बल्लाळ फडके वगैरे मंडळीचें ठिकाण लागलेंच नाहीं! विश्वासराव साहेब यांचा हत्ती प्रेतासुद्धां शत्रूंनीं वळवून नेला. आणि विश्वासराव साहेब यांचें स्वरूप गिलचे अबदल्ली व मनसूर अल्ली आणि सुजातदौले व इराणीकडील सरदारांनीं पाहून बहुत श्रम पावले, आणि म्हणूं लागले कीं, " असल्या मोहऱ्यास कोणीं गोळी घालून मारिला! जिवंत अंबारीसुद्धां धरून आणावयाचा होता. तुम्ही मारिला हें ठीक केलें नाहीं " असें म्हणून सर्वांनीं धरणीवर शरीरें टाकून हाय हाय! करूं लागले. कोणी आपल्या पदरानें अश्रु-द्ध पुसूं लागले. कोणीं मुखाशीं मुख लावूं लागले. तेव्हां शत्रूकडील सरदा-रांनीं तसलिमात केली कीं, " त्याजकडील लष्करांतून गोळी लागली आणि हक्क जहाले. याचा दोष आमचेकडे नाहीं." मग अबदल्ली वगैरे यांणीं कबर बांधावयास हुकूम दिला. तेव्हां अनुपगीर गोसावी, चैरणगीर गोसावी वगैरे

२. ढाला=निशाणें.
३. 'मसलत गादी०' प्र० ३. 'मसनद' याजबद्दल मसलत लिहिलसें वाटतें.
४. श्रम पावले=दुःखी जाहले.
५. 'अश्रु' प्रत १.
६. तसलिमात=प्रणामपूर्वक विनंति.
७. हक्क होणें=ठार होणें.
८. कबर बांधावयास=पुरावयास.
९. 'चरणगीर' हें नांव प्र० १ व २ मध्यें नाहीं. भाऊ साहेबांच्या बखरींत 'उमरावगीर' असें आहे. पृ० १२१ पहा.

रजपूत व रांगडे यांणीं अबदल्लीस अर्ज केला कीं, " आमचा हिंदूचा मुर्दा, त्यांत पेशवे बहादूर यांतील खांसा धनी, यांचे यडर्गे किंवा छत्री काय करणें ती आम्ही करूं. मुसलमानास ऐकंदर करूं देणार नाहीं. या विषयीं आम्ही सर्व हिंदु लढाईस मजबूत आहों, यांत अंतर नाहीं." अशी प्रत्युत्तरें गोसावी यांचीं वगैरे अबदल्लीव दिल्लीपत बादशहा वगैरे यांनीं ऐकून प्रेत त्यांचे हवालीं केलें.

पुरुषांत देखणा विश्वासराव साहेब किंवा बायकांत देखणी मस्तानीबाई साहेब, समशेर बहादूर यांची मातोश्री, अशीं दोन माणसें दक्षिणेत स्वरूपानें जहालीं. श्री० नानासाहेब अंशधारी पुरुष, त्यांत शाहू महाराज छत्रपती यांचा वरद हस्त मस्तकीं, तेणेंकरून सर्व पेशव्यांचे वंशांतील पुरुष जय संपादितच आले. शेलके घोडे व शेलके माणूस व शेलके हत्ती, शेलक्या सांडणी साठ कोश नित्य चालणार व शेलके जवाहीर व शेलकी तरवार व शेलक्या तोफा वगैरे शेलकें साहित्य सोनपत पानपत कुंजपूर व दिल्ली वगैरे ठिकाणीं सर्वस्व बुडालें. कितीकांचीं घरें बसलीं. कितीकांच्या नकला[13] जहाल्या. कितीक पुरुष शिपाईगिरीचे अहंकारी ते बद्रिकाश्रमास वगैरे पवित्र जागां तपस्वी तपश्चर्येस गेले. कितीक हातापायांनीं अधू जहाले आणि भाऊबंद लढाईंत गर्क जहाले, आतां देशीं काय जावें, या कारणास्तव गंगाप्रवाहीं व यमुनाप्रवाहीं कितीकांनीं घालून घेतलें. कितीकांनीं राज्यलोभें प्रयागीं जाऊन करवत घेतले. कितीक आभर जहाले. कितीक दरिद्री जहाले. ते पत्रीं कोठवर लिहावे !

ऐके बारनिस शत्रूकडील व श्रीमंतांकडील यीं उभयतांच्यीं दिनचर्येचें वर्तमान दफात्यास चिटणीसांनीं बार केली त्यांची संगत पाहून, कच्चा मजकूर सेवेशीं निवेदन करावयाकरितां यथामतीनें बखर सजवून सेवेशीं पाठविली आहे. शके १६८४ चित्रभानुनाम संवत्सरे माहे फाल्गुन शुद्ध ५ मंदवासर मुक्काम पुणें. मागून नवल विशेष वर्तमान होईल तें सेवेशीं सेवक निवेदन करतील.

---

१०. एकंदर=बिलकुल.

११. " ०आम्ही सर्वही लढाईस० " प्रत ३.

१२. 'यशधारी' प्र० १ व २. परंतु 'य' अक्षर 'अ' बद्दल चुकून पडलें असावें.

१३. नकला झाल्या=निर्वंश झाले.

१४. पुढील जन्मीं राज्य मिळावें एतदर्थ करवतानें आपलें शरीर कापविलें.

१५. 'नकला जाहल्या०' पासून तों या शब्दापर्यंत मजकूर प्र० ३ मध्यें नाहीं.

१६-१६. हे शब्द प्र० १।२ मध्यें नाहींत.

१७. दफातें=स्मरण वही. ह्या वहींत ज्या ज्या गोष्टी घडतील त्या टिपून खेरीज पत्रें व इतर कागदही बार करून ठेवावयाचे.

१८-१८. याजबद्दल प्र० ३ मध्यें " शके १६८३ वृषनाम संवत्सरे फाल्गुन शु॥ ५ मंदवार " असें आहे. मागें उपोद्घातांत 'फाल्गुन शुद्ध १५ पौर्णिमा' असें आहे तें चुकीनें पडलें गेलें.

कालोऽनुकूल इह नः क्षयकृद्रिपोस्ते
यात्रा मता मम यदिच्छसि तत् कुरुष्व ॥ ५३ ॥
निज़ामभूपो विशिखाधिनाथस्तदोचितां वाचमुवाच जीनः
मदीयतातेन पुराभियाता द्विजाः प्रजिग्युः प्रबलाः पुरा तम् ॥ ५४ ॥
पुरा जितं कैरपि मां युवानं रणाजिरे जिग्युरमी सपत्नाः ।
जराजितं मां हि जयेयुरेते किमत्र चित्रं युवराजमुख्याः ॥ ५५ ॥
अथापि मन्त्रिन् क्षमसे यदि त्वं समिद्रथस्यास्य धुरं वोढुम् ।
निवेद्य शत्रोः सचिवे तदेतद् यतस्व युद्धोद्यमनेऽचिरेण ॥ ५६ ॥
तथेति प्रतिज्ञाय सर्वं स वक्ता निजानीकिनीपान् धनैस्तोषयित्वा ।
धनागारकोशं विलोक्य प्रजज्ञे रिपोर्मंत्रिणो भिक्षुकत्वं दुरन्तम् ॥५७॥
तुरङ्गिणो ये रथिनः क्रमेलपालाश्च दन्तावलिनः प्रवीरम् ।

अखिलाऽपि भूमिः अक्रामि आक्रांता । इह अस्मिन् विषये नः कालः अनुकूलः अस्तीति शेषः । ते रिपोर्माधवस्य क्षयकृत् कालः । उभयोः सेनापतयोर्दिवंगतत्वात् नानाभिधस्य मंत्रिणः तु अवीरत्वादिति भावः । अतः मम यात्रा मता । यदिच्छसि तत् कुरुष्व । त्वं निग्रहानुग्रहसमर्थः अहं तु सूचनामात्रकरणे समर्थोऽस्मीति भावः ॥ ५३ ॥

अथ निज़ामभूपतिराह निज़ामेति । जीनः जीर्णः । जीनो जीर्णो जरन्नित्यमरः । विशिखानां यवनानां नाथः निज़ामभूपः तदा उचितां इति वाचं उवाच । इति किं । मदीयतातेन पुरा अभियाताः प्रबलाः द्विजाः तं प्रजिग्युः जितवंतः ॥ ५४ ॥

पितुर्वृत्तं निवेद्य स्ववृत्तमाह पुरेति । अमी सपत्नाः ब्राह्मणाः पुरा पूर्वं कैरप्यजितं तरुणं मां रणाजिरे जिग्युः । युवराजः प्रतिनिधिः मुख्यः येषां ते युवराजमुख्याः गूढाशयस्तु युवराजः तरुणाधिपः अतितरुणः शत्रुरहमतिवृद्ध इति । जरया जितं मां जयेयुरत्र किं चित्रं । न किंचिदाश्चर्यमित्यर्थः ॥ ५५ ॥

अथेति । हे मंत्रिन् त्वं अथापि एवं सत्यपि समित् संग्रामः स एव रथः तस्य धुरं वोढुं क्षमसे यदि तर्हि शत्रोः सचिवे तदेतत् युद्धोद्यममित्यर्थः । निवेद्य कथयित्वा। एतेन ते अपि संनद्धा बभूवुरिति भावः । युद्धोद्यमने अचिरेण यतस्व ॥ ५६ ॥

तथेति । वक्ता सः मशीरः तथेति तथास्तु इति स सर्वं प्रतिज्ञाय अंगीकृत्य निजाः ये अनीकिनीपाः सेनापतयः तान् धनैः तोषयित्वा धनस्य यत् अगारं गृहं तत्र कोशं अर्थराशिं विलोक्य रिपोर्माधवस्य मंत्रिणः नानाख्यस्य दुरंतं यावज्जीवमित्यर्थः । भिक्षुकत्वं प्रजज्ञे । नानाख्यं भिक्षुं विधाय काशींप्रति प्रेषयिष्यामीति प्रतिज्ञातवान् इत्यर्थः ॥ ५७ ॥

तुरंगिण इति । ये तुरंगिणः अश्वारोहाः ये रथिनः क्रमेलपालाः उष्ट्रवंतः दंता-

पदातयो गौरमुखा असङ्ख्या इवाययुः सागरमाशु नद्यः ॥ ५८ ॥

इति श्रीशिवकाव्ये कलिविलासे पुरुषोत्तमपंडितविरचिते सप्तदशश्चमत्कारः ॥

---

## अष्टादशश्चमत्कारः

स्वसखलेखसमीरसमेधितो द्विजसमाजपतिप्रियपावकः ।
स रुरुचे समिदुद्गतकान्तिभृद् भृतनिजोवनिभृत् सुखकारकः ॥ १ ॥
द्विजपतिर्द्विजराजसमद्युतिर्धृतिमता सचिवेन नयान्वितः
स जगदे जगदेकधुरन्धरो धरधरांशभवो भवनेऽजने ॥ २ ॥

बलिनो गजारोहा असंख्याः गौरमुखाः पदातयश्च सागरं नद्य इव प्रवीरं निजामं आशु आययुः ॥ ५८ ॥

इति श्रीशिवकाव्यव्याख्यायां स्वयंकृतायां काव्यप्रकाशिकायां सप्तदशश्चमत्कारः ॥१७॥

श्रीगणेशाय नमः । अथ श्रीमन्माधवस्यं युद्धोद्यममवतारयति स्वसखेति । स्वस्य यः सखा सचिवः भाग्यनगरवर्ती शत्रुमताभिज्ञानार्थं निरंतरं स्थापितः तस्य यः लेखः पत्रं युद्धोद्यमरूपं सः समीर इव वायुरिव स्वसखलेखसमीरः तेन समेधितः वर्धितः अन्यत्र स्वस्य सखा मित्रं लेखो देवः स चासौ समीरश्च स्वसखलेखसमीरः । लेखा अदिति नंदना इत्यमरः । तेन समेधितः वर्धितः समिति संग्रामे विषये या उद्गता कान्तिः क्षात्रं तेजः तद्बिभर्तीति तथोक्तः । अन्यत्र समिद्भिः काष्ठैः उद्गता या कान्तिः तेजः तां बिभर्तीति तथोक्तः । भृताः पोषिताः निजाः स्वकीयाः ब्राह्मणा इत्यर्थः येन सः । अन्यत्र भृताः निजा देवा येन सः । यजमानेन तत्तद्देवतामुद्दिश्य स्वस्मिन् प्रक्षिप्तं यद्धविस्तस्य समर्पणेन जनिभृतां सर्वेषां प्राणिनां यत् सुखं तस्य कारकः । यस्य राज्ये सर्वेऽपि सुखिनः न तु ब्राह्मणा एवेत्यर्थः । अन्यत्र जनिभृतां प्राणिनां सुखं जाठराग्निरूपेण भक्षितान्नं सुखेन पचनं करोतीति तथोक्तः । सः द्विजसमाजस्य ब्राह्मणसमूहस्य पतिः पालको नानाख्यो मंत्री तस्य प्रियः इष्टः श्रीमन्माधवः सः पावक इव अग्निरिव । अन्यत्र द्विजसमाजपतिः यागकृद्यजमानः तस्य प्रियः स चासौ पावकश्च द्विजसमाजपतिप्रियपावकः रुरुचे दिदीपे संतप्तोभूदित्यर्थः विशिखस्य युद्धोद्यमश्रवणेन भृशं क्रुद्धोभूदिति भावः । रुचदीप्तावभिप्रीतौ चेत्यतः कर्तरि लिट् ।१-

द्विजेति । धृतिर्धैर्यं यस्यास्तीति धृतिमान् तेन धृतिमता । धृतिर्योगांतरे धैर्ये धारणाध्वरतुष्टिषु इति विश्वः । सचिवेन नानाख्येन । नयेन नीत्या अन्वितः युक्तः । द्विजराजेण चंद्रेण समा द्युतिर्यस्येति द्विजराजसमद्युतिः जगतः एकधुरंधरः । धरो गोवर्धनस्तस्य धरो धर्ता श्रीकृष्णः तस्य अंशेन भवः उत्पन्नः सः माधवः नास्ति

यवनपो वनपो मृगराडिव स्वत्रसतेर्वसतिं करिसंहतेः
निनदनादितदिग्वदनः पुनः समुपसर्तुमिहोत्सहते ह ते ॥ ३ ॥
वच उवाच चिरं स विचिंतयंश्चरितमात्मकुलोचितमंञ्चितम्
सचिव दुर्विषहोऽपि स केसरी करिवरैर्बहुशो भुवि पातितः ॥ ४ ॥
कथमिदं भवितेति न मन्यतां नरवरो हि नरादमजीघनत्
सुरवराधिपतिर्भगवान् क्षणाद् गिरिमणुं कुरुतेऽणुमथो गिरिम् ॥ ५ ॥
सकलसैनिकपालकनायकः स किल दौलत इत्यभिधां दधत्
क्षणत एनमरिं विनिपातयेत् किमुत ते सकला यदि संयुताः ॥ ६ ॥

जनो यस्मिन् तत् अजनं तस्मिन् जनवर्जिते। षट्कर्णोभिद्यते मंत्र इति मंत्रगोपनार्थं इत्यर्थः भवने गृहे इति जगदे उक्तः। गदेः कर्मणि लिट् ॥ २ ॥

अथ नानाख्यः मंत्री माधवस्य धैर्यविलोकनार्थं यवनाधिपस्य पराक्रममाह यवनेति। निनदेन शब्देन नादितानि दिशां वदनानि येन सः यवनपः निजामः वनं पातीति वनपः मृगराट् सिंहः स्ववसतेः स्ववासस्थानात् करिसंहतेः वसतिमिव ह इति खेदे पुनः पुनः इत्यनेन पूर्वं स आगतः तेन स्थलमिदं दृष्टं दग्धं चातः तस्यागमने भीतिर्नास्तीति सूचितं। इह अस्मिन् त्वदीयावसरे ते वसतिं पुण्यनगरीं गंतुं उत्सहते इच्छति ह इति खेदे ॥ ३ ॥

माधवस्तु मंत्रिणा रिपौ सिंहत्वं स्वस्मिन् गजत्वं आरोपितं तन्निशाम्य उत्तरमाह वच इति त्रिभिः। वच इति। सः माधवः आत्मकुलोचितं अंचितं पूजितं चरितं चिरं स्वावकाशं विचिंतयन् सन् वचः उवाच हे सचिव प्रधान दुर्विषहोऽपि सः केसरी सिंहः करिवरैः गजेंद्रैः मत्पूर्वजैरित्यर्थः बहुशः बहुवारं। बह्वल्पार्थाच्छस्कारकादन्यतरस्यामिति शस् प्रत्ययः। भुवि पातितः। यदा यदा स आगतः तदा तदा मत्पूर्वजैरेव पराजित इति भावः ॥ ४ ॥

कथमिति। इदं गजैः सिंहनिपातनं कथं भविता इति न मन्यतां। हि यस्मात् कारणात् नरवरो रामः मनुष्य इत्यर्थः। नरान् मनुष्यान् अत्तीति नरादः रावणः राक्षसः तं अजीघनत् हतवान्। हंतेर्णिजंतात् च्लेश्चङि द्वित्वे रूपं। अत्रार्थे लोकोक्तिं प्रमाणयति। सुरवराधिपतिर्भगवान् विष्णुः क्षणात् गिरिं पर्वतं अणुं सर्षपप्रायं कुरुते अथो अनंतरं अणुं सर्षपं गिरिं पर्वतं कुरुते ॥ ५ ॥

सकलेति। दौलत इति अभिधां नाम दधत् सः सकला ये सैनिकाः तेषां पालकः तेषां नायकः स्वामी क्षणादिति क्षणतः एनं अरिं विनिपातयेत् ते सकलाः सेनापतयः यदि संयुताः तर्हि विनिपातयेयुरिति किमुत किमु वक्तव्यं ॥ ६ ॥

---

१ "नोऽधुना" इति वा पाठः २ "धावरः" इति वा पाठः

अनुक्रमणिका

नाना त्रिशक्तिरुचिरार्थपरिप्लुतं तद्
वाक्यं विभोर्विविधयुक्तियुतं निशम्य ।
प्रावीवदत् स च पुनः समरामरेज्या-
भारं निधाय किल सैनिकनाथनाथे ॥ ७ ॥
गाधेस्तनूजेन विसृष्टिकर्त्रा तपोविहीनान् विविधास्त्रमूढान् ।
नृपान् समीक्ष्यास्त्रिजयेऽपि शक्तास्तोफाः कृता दारुविपूर्णगर्भाः ॥ ८ ॥
तुफोति हिंसार्थकधातुजन्मा पचाद्यचि स्त्री महती लघुश्च ।
सा मध्यमा धातुसमूहजाता लौही च पर्जन्यनिनादशब्दा ॥ ९ ॥
औणादिके दारयतेरुणि स्त्री दारुः प्रभो लोकत एव लिङ्गम् ।
निर्दग्धमूलैर्धुमणेश्च गंधो भौमेन युक्तो लवणेन सा स्यात् ॥ १० ॥

नानेति । नानाख्यः मंत्री स्वरादिवत् अव्ययं, इदं अव्ययादाप् सुप इति सुपो लुक् । तिस्रश्च ताः शक्तयः च त्रिशक्तयः प्रभुमंत्रोत्साहाख्याः ताभिः रुचिरः सुंदरो योऽर्थः तेन परिप्लुतं व्याप्तं । यद्वा तिस्रः शक्तयः यस्मिन् तत् त्रिशक्ति इत्येकं पदं विविधाः या अनेकाः या युक्तयस्ताभिर्युतं तत्पूर्वोक्तं विभोर्माधवस्य वाक्यं निशम्य । निजसैनिकनाथनाथे दौलताभिधे समरः संग्रामः स एव अमरेज्या यागः तस्याः भारं निधाय । शत्रुपराजयस्त्वयैव कर्तव्य इति निवेद्य पुनश्च प्रावीवदत् उक्तवान् । स्वार्थणिजंतात् वदेर्लुङ्श्चङि द्वित्वे रूपं ॥ ७ ॥

अथ युद्धसामग्री का वा अपेक्षितेति प्रष्टुमिच्छंतं प्रभुः स्वयमेव आह गाधेरिति । विसृष्टिः प्रतिसृष्टिः तां करोतीति विसृष्टिकर्ता तेन गाधेस्तनूजेन विश्वामित्रेण नृपान् तपोविहीनान् अत एव विविधास्त्रमूढान् समीक्ष्य । आस्त्रिणां अस्त्रवतामपि जये शक्ताः समर्थाः दारुणा चूर्णविशेषेण पूर्णः गर्भो यासां ताः तोफाः कृताः ॥ ८ ॥

तोफेति शब्दः संस्कृतः वाऽसंस्कृत इति संदेहे तस्य निरुक्तिपूर्वकं तोफायास्त्रैविध्यमाह तुफेति । पचादिश्चासावच् च पचाद्यच् तस्मिन् कृते सति तुफतुफ हिंसार्थो इति हिंसार्थकाद्धातोर्जन्म उत्पत्तिर्यस्याः सा तोफा भवति तोफति हिंसतीति तोफा । अचि लघूपधलक्षणे गुणे टाप् प्रत्यये च कृते स तोफाशब्दः अन्वर्थः संपन्नो भवतीत्यर्थ स्त्रीलिंगे अयं शब्दः अत्र प्रमाणमनुपदमेव वक्ष्यामि । एवं नामनिरुक्तिमुक्त्वा तस्याः स्वरूपं त्रिप्रकारकमाह । सा तोफा महती मध्यमा लघुश्च लघुशब्दात् गुणवाचकात् वोतो गुणवचनादिति विकल्पान्ङीबभावः । किं विशिष्टा सा । पर्जन्यो मेघः तस्य निनाद इव शब्दो यस्याः । पुनः किंविशिष्टा । धातूनां सुवर्णादीनां समूहः संघस्तस्माज्जाता । लोहस्य इयं लौही च भवति । लोहशब्दादिदमर्थेऽणि ॥९॥

दारुविपूर्णगर्भेत्युक्तमतः दारुशब्दनिरुक्तिपूर्वकं तस्याः कृतिमाह औणादि-

१ " निज " इति वा पाठ

निपातकालावधि रोरवीति शब्दार्थकस्तद्बणतेः स बाणः।
दशाधिकान् हन्ति रणाङ्गणेऽसौ दारूदरो लोहमयः स दण्डः ॥ ११ ॥
लक्ष्यैकदेशः किल बिन्दुरुक्तस्तं हन्ति यस्मादिह बिन्दुखेति।
मुखाग्रबिन्दुस्तमनुसृता वा यतः शरव्यं हरतीति सोक्ता ॥ १२ ॥
शकटरोहितयन्त्रचयावलिस्तव विभो रणमूर्धगता सती।
अतनुमप्यतनुं तनुयात् कथासमवशेषमलं कनकाचलम् ॥ १३ ॥

क इति। दारयतेः दृ विदारणे इति धातोः उणि उण् प्रत्यये कृते सति दारुर्भवति दारयति नाशयतीति दारुः अन्वर्थो दारुशब्दः संपन्नो भवतीत्यर्थः। स्त्रीलिंगे। ननु-कोशादिप्रमाणाभावात् स्त्रीलिंगत्वं कथमित्याह। हे प्रभो लोकत एव लिंगं लिंगं निर्णेयं। लोके हि दारुरानीता दारुः स्थापिता इति व्यवहाराज्ज्ञेयं। यथाह भगवान् भाष्यकारः। लिंगमशिष्यं लोकाश्रयत्वाल्लिंगस्य। अथ कृतिमाह निर्दग्धेति। द्युमणेः रवेः निर्दग्धानि यानि मूलानि तैः ‡रविमूलाशीखित्रैरित्यर्थः भूमेः इदं भौमं तेन भौमेन लवणेन च युक्तः गंधः गंधकः सा स्याद्दारुः स्यात् ॥ १० ॥

निपातेति। सः लोके प्रसिद्धः बाणः यत् निपातस्य पतनस्य यः कालः सः अवधिर्यथा स्यात्तथा रोरवीति पुनः पुनः रौति रोरवीति पुनः पुनः शब्दं करोतीत्यर्थः तत्तस्मात् शब्दः अर्थः यस्येति शब्दार्थकः समासांतः कः बणते बेणधातोर्बाणः भवतीति शेषः। बणति शब्दं करोतीति बाणः। बणेत्यपि केचित्पठंतीत्युक्तात् बणधातोरणि रूपं। एवं संज्ञामुक्त्वा संज्ञिनः स्वरूपं कृत्यं चाह दशेति। दारुः उदरे यस्येति दारूदरः लोहप्रचुरः लोहमयः सदंडः दंडेन सहितः सदंडः असौ बाणः रणांगणे दशाधिकान् हंति दशभ्योधिकाः दशाधिकाः वीरांस्तान् हंति नाशयति ॥ ११ ॥

अथ बिंदुखाशब्दनिरुक्तिमाह लक्ष्येति। लक्ष्यस्य शरव्यस्य वेध्यस्येति यावत्। यः एकदेशः एको भागः बिंदुरुक्तः तं यस्मात् हंति तस्मादिह अस्मिन् लोके बिंदुखेति संज्ञेत्यर्थः। बिंदुं खनतीति बिंदुखा। बिंदूपपदात् खनु अवदारणे इत्यस्मात् धातोरौणादिको ड प्रत्ययः डित्वाट्टिलोपः। यद्वा। मुखस्य अग्रं मुखाग्रं तस्मिन् यः बिंदुः लोके मक्षिकेति प्रसिद्धा तां अनुसृता सती शरव्यं लक्ष्यं हरतीति सा बिंदुखा उक्ता बिंदुना खनतीति बिंदुखा। यद्यपि इदं कृत्यं वीरस्य वेद्धुः तथापि काष्ठानि पचंतीतिवत् सौकर्यातिशयात् बिंदुखायामारोपितं ततः इयं निरुक्तिः संपन्ना ॥ १२ ॥

शकटेति। हे विभो माधव। तव शकटेषु रोहिता आरोपिता या यंत्रचयानां आवलिः पंक्तिः। रणमूर्धगता सती। न तनुः अतनुः तं अतनुं महांतं कनकाचलं नास्ति तनुः शरीरं यस्येत्यतनुः तं अतनुं अशरीरं अत एव कथैव समवशेषो

४ "उत्थान" इति वा पाठः ५ "तो" इति वा पाठः. * महाराष्ट्र भाषायां "डह" इत्याख्यस्य. ‡ महाराष्ट्र भाषायां "कोळसे" इति प्रसिद्धैः

क्षणे क्षणे दौलतसैन्यपालयन्त्राग्र्यवक्त्राम्बरतः सहस्रम् ।
अयोमयास्तप्ततराः कराला गोला विनिर्यान्ति कपित्थतुल्याः ॥ १४ ॥
अनादरो होड इति प्रसिद्धो रिपोर्विधत्ते समसौ रणे यत् ।
ततो ह्ययं होळकरोपनामा पताकिनीनामधिपस्तवास्ते ॥ १५ ॥
पनसोपमलोहगोलकाः पनसास्तैः प्रहरन्ति यद्रिपून् ।
तव पानसिकाभिधा इमे किल जेष्यन्ति रिपोरनीकिनीम् ॥ १६ ॥
तोफाकृत्यनियोजितास्तव विभो ये पानसे नामका
वीरा भूमिसुराः सुरा इव सुरापारिक्षये दीक्षिताः ।
सृष्टचन्ताम्बुधयो जगत्त्रयमिव क्रोधोपतापाकुलाः

यस्य सः तं कथासमवशेषं अलं अत्यंतं तनुयात् कुर्यात् ॥ १३ ॥

स्वकीययंत्रमाहात्म्यमुक्त्वा सेनापतेर्यंत्राणां त्वरामाह क्षणे इति । दौलतो यः सैन्यपालः सेनापतिः तस्य यंत्राग्र्याणि यंत्रश्रेष्ठानि तेषां वक्त्राणि मुखानि तेषां अंबरतः अवकाशतः क्षणे क्षणे सहस्रं सहस्रसंख्या । एतेन त्वरा द्योतिता । अयस्मयाः लोहमयाः यद्यपि अयस्मयादीनि छंदसीति एतस्य छंदसि साधुत्वं तथापि निरंकुशाः कवयः यद्वा अयोमया इति पाठ्यं । कपित्थतुल्याः कपित्थप्रमाणाः तप्ततराः करालाः भयंकराः गोलाः गोलकाः रणे संगरे विनियांति गच्छंति ॥ १४ ॥

अथ होळकराख्यस्य सेनापतेर्नामनिरुक्तिमाह अनादर इति । यद्यस्मात् असौ सेनापतिः हुडु होडृ अनादर इति धातोरुत्पन्नः होड इति शब्दः अनादर इति प्रसिद्धः । रणे संग्रामे रिपोः तं होडं अनादरं विधत्ते करोति ततः होळकरोपनामा डलयोरभेदादिति भावः । तव पताकिनीनां अधिपः आस्ते ॥ १५ ॥

अथ पानसिकशब्दनिरुक्तिमाह पनसेति । पनसानां फलानि पनसानि फलेलुक् तानि उपमा येषां ते पनसोपमाः स्थौल्ये पनसफलतुल्याः इति अर्थः पनसोपमा ये लोहगोलकाः ते लक्षणया पनसाः तैः तोफांतर्गतैरित्यर्थः रिपून् प्रहरंति यत् तस्मात् पानसिका इति अभिधा येषां ते पानसिकाभिधाः पनसाः प्रहरणं येषां ते पानसिकाः पनसशब्दात्प्रहरणमिति ठक् प्रत्यये रूपं ते पानसिकाभिधाः तव रिपोः शत्रोः अनीकिनीं सेनां जेष्यंति अभिभविष्यंति किल । जि जि अभिभवे इत्यस्य रूपं न तु जि जये इत्यस्य तस्य अकर्मकत्वात् ॥ १६ ॥

पटवर्धनसंज्ञानिरुक्तिपूर्वं तेषां पराक्रममाह यश इति । ये तवेत्यध्याहारः यश एव पटः वस्त्रं तत् वर्धयंति ते वर्धयंतः अतः पटवर्धनसंज्ञकाः संति सेनापतय इत्यर्थः ।

---

६ " अयस्मया " इति वा पाठः ७ " कराः " इति वा पाठः ८ " रणे " इति वा पाठः ९ "अनादरं " इति वा पाठः १० " यदयं नितान्तम् " इति वा पाठः ११ " पानसनामधेयका विजयेरन् रिपुवाहिनीं क्षणात् " इति वा पाठः

राघवाच्या गुणा न दिसे तुळणा । कैलासींचा राणा लांचावला ॥ २ ॥
देवाचें मंडण भक्ताचें भूषण । धर्मसंरक्षण राम एक ॥ ३ ॥
रामदास म्हणे धन्य त्याचें जीणें । कथानिरूपणें जन्म गेला ॥ ४ ॥

१९.

आम्हीं देखिला विठोबा । आनंदे विटेवरी उभा ॥ १ ॥
तेथे दश्याची जे दाटी । ते ची रुक्मिणी गोमटी ॥ २ ॥
रामीरामदास म्हणे । जो ओळखे तो ची धन्य ॥ ३ ॥

२०.

लांचावोनी भक्ति लोभा । वाळवंटी असे उभा ॥ १ ॥
पदकीं इंद्रनीलशोभा । प्रभेनें शोभा उजळती ॥ २ ॥
भक्त पुंडलिके गोंविला । जाऊं नेदी भांबाविला ॥ ३ ॥
विटे नीट असे ठाकला । भीमातीरवाळुवंटीं ॥ ४ ॥
भाग्य पुंडलिकाचें । उभें दैवत त्रिलोकींचें ॥ ५ ॥
कीं जें तारूं भवसागरीं । भीमातीरीं विनटलें ॥ ६ ॥
एके पुंडलिकें करूनी जोडी । आम्हासी दिधली कल्पकोडी ॥ ७ ॥
तुटली संसारसांकडी । रामदास म्हणतसे ॥ ८ ॥

२१.

जीवन्मुक्त प्राणी होऊनियां गेले । तेणें पंथें चाले तो ची धन्य ॥ १ ॥
जाणावा तो ज्ञानी पूर्ण समाधानीं । निःसंदेह मनीं सर्व काळ ॥ २ ॥
मिथ्या देहभान प्रारब्ध आधीन । राखे पूर्णपण समाधानीं ॥ ३ ॥
आवडीनें करी कर्म उपासना । सर्व काळ ध्यानारूढ मन ॥ ४ ॥
पदार्थाची हाणी हाता नये कोणी । जयाची करणी बोला ऐशी ॥ ५ ॥
धन्य पैं ते दास संसारीं उदास । तयां रामदास नमस्कारी ॥ ६ ॥

२२.

संसार देखीला तरी पाहें सार । वायां येरझार पाडूं नको ॥ १ ॥
पाडूं नको दुःखसागरीं आपणा । म्हणे नारायणा ओळखावें ॥ २ ॥
ओळखावें वेगीं आपआपणाशी । संसारीं सुटशी दास म्हणे ॥ ३ ॥

२३.

विचारें संसार होतो देशधडी । सोनियाची घडी जात असे ॥ १ ॥
डावा तास गेला मोक्षपंथा जातां । विवेकें तत्वतां याशी नांवें ॥ २ ॥
सदा श्रीरामाचें भजन करितां । दास म्हणे चिंता दूर होय ॥ ३ ॥